उप अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क
(गट-ब) या संवर्गातील अधिकाऱ्याच्या
मुदतपूर्व, विशेष बदलीबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन आदेश क्रमांक :- इएसटी-१२२०/प्र.क्र.७४/राउशु-१,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ०९ सप्टेंबर, २०२०.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या ४(५) मधील तरतुदीनुसार राज्य उत्पादन शुल्क विभागातील उप अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (गट-ब) या संवर्गातील खालील अधिकाऱ्याची, सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने, विशेष कारणास्तव मुदतपूर्व बदली करण्यात येत असून, त्यांची पदस्थापना खालील स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद | नवीन पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्रीमती ज्ञानेश्वरी आहेर | उप अधीक्षक, नागपूर-१ | उप अधीक्षक, जी. एम. ब्रेवरीज, विरार, जि. पालघर |

२. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. संबंधित अधिकाऱ्यास सदर पदावर रूजू होण्यासाठी दि.०९.०९.२०२० (म.नं.) पासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. सदर अधिकाऱ्याने कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता बदली पदावर तात्काळ रूजू व्हावे. सदरचे आदेश हे बदली तसेच कार्यमुक्तीचे आदेश असून आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी किंवा क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही. सदर अधिकाऱ्याने पदभार स्वीकारल्यानंतर त्याबाबतचा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. या आदेशाची प्रभावी अंमलबजावणी होण्याकरिता बदली झालेल्या अधिकाऱ्याचे वेतन/ भत्ते कोणत्याही परिस्थितीत या आदेशाच्या दिनांकापासून बदलीपूर्व कार्यालयाने आहरित करू नये.

३. सदर बदली आदेशातील अधिकाऱ्यास कोणताही बदली भत्ता व पदग्रहण अवधी अनुज्ञेय असणार नाही.

४. बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी जर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्याविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००९०९१२२९३२६५२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=c01c962d08bd39997d4c4d6e7e19f8acf340d1a5c4dd2b9a00977369607bbf82, ou=HOME DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2020.09.09 12:31:25 +05'30'

**( युवराज ब. अजेटराव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति:**

१) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३) संबंधित विभागीय उपायुक्त, राज्य उत्पादन शुल्क (मार्फत आयुक्त, राउशु, महाराष्ट्र राज्य, मुंबई.)
४) सबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
५) संबंधित अधिकारी (मार्फत संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.)
६) निवडनस्ती (राउशु-१)

************